# कणीस

## युक्रेनी लोककथा







चित्रे : वास्नेत्सोव

अनुवादक – अनिल हवालदार



प्रगती प्रकाशन

मॉस्को



कोणे एके काळची कथा. लचक्या आणि मुरक्या नांवाचे दोन छोटे उंदीर रहात होते. तसेच सोनकंठ्या नांवाचा एक कोंबडा रहात होता. ते उंदीर काहीही उद्योग करीत नसत. सदान्कदा नाचायचे, गायचे आणि लचकत मुरडत बागडत रहायचे. पण कोंबडा मात्र सूर्योदयाबरोबर जागा व्हायचा, आपल्या गाण्याने इतर सर्वांना जाग आणायचा आणि मग कामावर जायचा.

एकदा कोंबडा अंगण झाडीत असताना त्याला जमिनीवर एक धान्याचे कणीस सापडले. “अरे लचक्या मुरक्या,” कोंबड्याने साद घातली, “हे बघा मला काय सापडलंय!”



उंदीर धावत धावत त्याच्याजवळ गेले आणि म्हणाले :
“ते झोडपले पाहिजे.”
“कोण झोडपणार?” कोंबड्याने विचारले.
“मी नाही!” लचक्या म्हणाला.
“मी नाही!” मुरक्या म्हणाला.





"मग मी स्वतःच हे काम करतो," कोंबडा म्हणाला.
आणि तो कामाला लागला.
उंदीर चेंडूने खेळू लागले.





कोंबडा गिरणीतून परत आला आणि त्याने उंदरांना पुन्हा साद घातली:
"अरे लचक्या, इकडं ये! अरे मुरक्या, इकडं ये! मी पीठ आणलंय."
उंदीर पळत पळत गेले, त्यांनी पीठ पाहिले आणि ते कोंबडचाचे कौतुक करू लागले:
"किती शहाणा कोंबडा! किती हुषार कोंबडा! आता हे पीठ कालवून त्याच्या केक भाजल्या पाहिजेत!"
"पीठ कोण कालवणार?" कोंबडचाने विचारले.
"मी नाही!" लचक्या कुचकुचला.
"मी नाही!" मुरक्या कुचकुचला.



"मग हे काम मी स्वतःच करीन," कोंबडा म्हणाला.

त्याने पिशवी खांद्यावर मारली आणि तो निघाला.

तो गेला त्यावेळी उंदीर बेडुकउड्या खेळीत होते. एकमेकांच्या अंगावर ते उड्या मारीत होते आणि मजेत खिदळत होते.





कोंबड्याने झोडपणी संपवली आणि साद घातली:
"अरे. लचक्या मुरक्या, इकडं या. मी झोडपलेलं हे धान्य बघा!"
उंदीर धावत धावत गेले आणि एकसुरात कुचकुचले:
"आता धान्य गिरणीत नेलं पाहिजे आणि दळून पीठ आणलं पाहिजे!"
"कोण घेऊन जाईल?" कोंबड्याने विचारले.
"मी नाही!" लचक्या ओरडला.
"मी नाही!" मुरक्या ओरडला.



कोंबड्याने थोडा विचार केला आणि तो म्हणाला:
"मग हे काम मलाच केलं पाहिजे."

त्याने पीठ कालवले, सरपण आणले आणि चूल पेटवली. भट्टी गरम झाल्यावर त्याने केक भाजायला घातल्या.

इकडे उंदीरही वेळ फुकट घालवीत नव्हते: ते गाणी गात होते आणि नाचत होते.





केक तयार झाल्यावर कोंबडचाने त्या भट्टीतून बाहेर काढल्या आणि टेबलावर ठेवल्या. उंदीर धावत धावत आले. त्यांना हाक मारायची वाटही न पाहता यावेळी ते स्वतःच आले.

"ओहोहो, काय कडकडून भूक लागलीय मला!" लचक्या कुचकुचला.

"ओहोहो, केव्हा एकदा खाईन असं झालंय!" मुरक्या कुचकुचला.

पटकन ते टेबलाशी येऊन बसले.

पण कोंबडा म्हणाला :

"एक मिनिट थांबा, एक मिनिट थांबा! प्रथम मला सांगा : कणीस कुणाला सापडलं?"

"तुला सापडलं!" छोटे उंदीर ओरडले.

"आणि ते कुणी झोडपलं?" कोंबडचाने विचारले.

"तू झोडपलं!" ते दोघेही थोडचा खालच्या आवाजात म्हणाले.

"आणि धान्य गिरणीत कोण घेऊन गेलं?"

"तूच!" लचक्या मुरक्यांचा आवाज आणखी खालावला.

"आणि पीठ कुणी कालवलं? सरपण कुणी आणलं? चूल कुणी पेटवली? केक कुणी भाजल्या?"

"हे सगळं तू केलं! फक्त तू!" उंदीर अस्पष्ट आवाजात कुजबुजले.

"आणि तुम्ही काय केलंत?"

ते काय बोलणार? बोलायला त्यांच्यापाशी तोंडच नव्हते.

मुकाटचाने लचक्या आणि मुरक्या टेबलावरून उठून गेले. कोंबडचाने त्यांना परत बोलावले नाही.

अशा भीकमाग्या आणि रिकामटेकडचांची केक खाण्याची लायकीच नाही!



